**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत बहुवर्षिय वैरण पिकांची लागवड व उत्पादन करुन मूरघास तयार करणे या प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. राकृवि-२०१७/प्र.क्र.८९/पदुम-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ एप्रिल, २०१७.

वाचा - १. राकृवियो कक्ष यांचे पत्र क्र.राकृवि-०९१६/प्र.क्र.१३६/राकृवियो कक्ष, दि. ०७.०२.२०१७ अन्वये दि. २३.०१.२०१७ रोजी पार पडलेल्या २२ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्रमांक वैवि/ब-९ (२)/२८६९१-२८६९२/२०१७,पसं-१४, पुणे ६७,दिनांक १३.४.२०१७.

**प्रस्तावना :**

राज्यातील पशुधनास आवश्यक असणा-या हिरव्या वैरणीच्या उपलब्धतेमधील कमतरता, अनियमित व अपु-या पर्जन्यमानामुळे उद्भवणारी टंचाई परिस्थिती व टंचाई परिस्थितीत पशुधनास कमी पोषणमूल्य असलेली वैरण खाऊ घालावी लागते. यामुळे पशुधनाच्या उत्पादन क्षमतेवर विपरित परिणाम होतो. बहुवर्षिय वैरण पिकांच्या सुधारीत प्रजातींची लागवड करण्याकरीता पशुपालकांना प्रोत्साहित केल्यास उत्पादित होणा-या हिरव्या वैरणीपासून मुरघास तयार करता येऊ शकेल. सदरचा मूरघास पशुधनास, हिरवी वैरण उपलब्ध नसलेल्या कालावधीत व टंचाई परिस्थितीमध्ये खाऊ घालण्याकरीता उपयोगात आणला जाऊ शकतो.

दिनांक २३ जानेवारी, २०१७ रोजी राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या पार पडलेल्या २२ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या सभेमध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत बहुवर्षिय वैरण पिकांची लागवड व उत्पादन करुन मूरघास तयार करणे या प्रकल्पास मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने, खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत बहुवर्षिय वैरण पिकांची लागवड व उत्पादन करुन मूरघास तयार करणे या प्रकल्प प्रस्तावास याद्वारे शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तसेच, या प्रकल्पासाठी येणारा खर्च रु. ६९७.०० लक्ष यास वित्तीय मान्यता देखील प्रदान करण्यात येत आहे. सदरचा प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधीन राहून राबविण्यात यावा.

सदर प्रकल्पाची अंमलबजावणी ही केंद्र शासनाने, राष्ट्रीय पशुधन अभियानातंर्गत वैरण व पशुखाद्य या उप-अभियानांतर्गत विविध कार्यक्रमांसाठी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना विचारात घेऊन करण्यात यावी. या प्रकल्पांतर्गत लाभार्थ्यांना देय असलेले अनुदान थेट लाभ हस्तांतरण पध्दतीने लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावा.

सदर प्रकल्पांतर्गत खर्चाच्या बाबी, यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून उपलब्ध होणारा निधी, राज्य शासनाचे अनुदान आणि लाभार्थी हिस्सा याचा तपशिल खालीलप्रमाणे राहील.

| अ. क्र. | खर्चाची बाब | राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून उपलब्ध होणारा निधी | राज्य शासनाचे अनुदान | लाभार्थी हिस्सा |
|---|---|---|---|---|
| १ | बहुवर्षिय वैरण पिकांची लागवड व उत्पादन | ६० % | ४० % | निरंक |
| २ | विद्युतचलीत कडबाकुट्टी यंत्राचे वाटप | ५० % | निरंक | ५०% |
| ३ | मूरघास बनविण्याचे सयंत्र स्थापन करणे | ६०% | निरंक | ४० % |

उपरोक्त नमूद तीनही खर्चाच्या बाबींकरीता राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून एकूण रु. ४.१३ कोटी निधी उपलब्ध होणार असून, यास अधीन राहून आवश्यक त्या बाबीसाठी राज्य शासनाचा निधी व लाभार्थी हिस्सा याच्या अनुषंगाने प्रकल्प राबविण्यात यावा.

राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने दिलेल्या निर्देशानुसार १ मेट्रीक टन क्षमतेच्या मूरघास बॅगा ते जास्तीत जास्त १० मेट्रीक टन क्षमतेचे मूरघास युनिट या प्रकल्पांतर्गत स्थापन करण्यात यावे.

**लाभार्थीची निवड :-**

राज्यातील मुंबई व मुंबई उपनगर हे दोन जिल्हे वगळून इतर सर्व जिल्हयांमधील लाभार्थ्याची निवड संबधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांच्यामार्फत करण्यात यावी. जे लाभार्थी पशुसंवर्धन विभागाचे विविध कार्यक्रम जसे की गायी-म्हशींमध्ये कृत्रीम रेतन, जनावरांचा विमा उतरविणे, त्यांचेकडील जनावरांना टॅगींग करुन घेणे इत्यादीमध्ये सहभागी होतात अशा लाभार्थ्यांनाच प्राधान्यानेया प्रकल्पांतर्गत लाभ देण्यात यावा. तसेच, लाभार्थ्यांची निवड करताना त्यामध्ये ३० टक्के महिला व ३ टक्के अपंग लाभार्थ्यांचा समावेश होईल, असे पहावे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार एकूण निधी पैकी आवश्यक तो निधी अनुसूचित जाती व जमातीच्या लाभार्थ्यासाठी खर्ची पडेल असे देखील पहावे.

केंद्र पुरस्कृत वैरण व पशुखाद्य विकास कार्यक्रम, राष्ट्रीय पशुधन अभियान, कृषि व पशुसंवर्धन विभागाच्या जिल्हा वार्षिक आणि राज्यस्तरीय योजनेअंतर्गत ज्या लाभार्थ्यांना यापुर्वी विद्युतचलित कडबाकुट्टी यंत्राचा पुरवठा व मूरघास बनविण्याचे युनिट स्थापन करणे या अंतर्गत लाभ देण्यात आलेला आहे अशा लाभार्थ्यांना या प्रकल्पाअंतर्गत लाभ देय होणार नाही.

जिल्हा स्तरावर संबधित जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त हे या प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. सदर प्रकल्पाचे संनियंत्रण विभागीय स्तरावर संबधित विभागाचे प्रादेशिक सहआयुक्त

पशुसंवर्धन व राज्यस्तरावर आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे हे करतील. सदरच्या प्रकल्पास आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान करावी.

हा प्रकल्प राबवून झाल्यानंतर आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रकल्पाची फलनिष्पत्ती त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावी.

या प्रकल्पातंर्गत उपलब्ध झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वंतत्रपणे विहीत लेखापध्दतीनुसार ठेवण्यात यावा. तसेच, मंजूर व उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी विहीत कालमर्यादेत १०० टक्के खर्ची करुन, त्याबाबतचे विहीत प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त पशुसंवर्धन यांनी शासनास सादर करावे. जेणेकरुन ते सचिव (पदुम) यांचे प्रतिस्वाक्षरीने राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांचेकडे सादर करण्यात येईल.

सदरचा प्रकल्प राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दिनांक २३ जानेवारी, २०१७ रोजीच्या बैठकीतील निर्णय व राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सुचना तसेच, केंद्र शासनाने राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या अंमलबजावणीकरीता निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना विचारात घेऊन राबविण्यात यावा.

या प्रकल्पाचा समावेश संबधित जिल्हयाच्या जिल्हा कृषि आराखडयात (C-DAP) करण्यात येवून तसे, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांना तसेच, या कार्यासनास कळविण्यात यावे.

केंद्र शासनाने विकसित केलेल्या RDMIS या प्रणालीवर या प्रकल्पाची माहिती भरण्यात यावी. तसेच, प्रकल्पाच्या आर्थिक खर्चाचा आणि भौतिक साध्याचा मासिक प्रगती अहवाल नियमितपणे शासनास सादर करावा.

प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय अंमलबजावणी यंत्रणांनी आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी ठेवावा.

या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीकरीता आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सुचना आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या स्तरावरुन सर्व संबंधितांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०४२९१६५२५१८८०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shashank M. Sathe

Digitally signed by Shashank M. Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6b4e6443f4621997398029547f71977c2d89e32e391d622c519f39893078c30b, cn=Shashank M. Sathe
Date: 2017.04.29 16:54:45 +05'30'

**( श.मा.साठे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. अपर मुख्य सचिव, (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४. उपसचिव (राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई/नागपूर.
६. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, (सर्व)
७. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, (सर्व)
८. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)/निवड नस्ती पदुम-४.